धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा निर्धन व दुर्बल घटकांतील रुग्णांसाठी पारदर्शक पध्दतीने उपलब्ध करुन देण्याकरिता विशेष मदत कक्ष स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः समिती २५२३/ प्र.क्र.५८/का.१५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ९ मे, २०२४

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.लवेसू-२०१०/७३/(११)/ का. १५, दिनांक २२/०७/२०१०
२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. समिती २५२३/ प्र.क्र.५८/का.१५, दिनांक ३१/१०/२०२३

**शासन शुध्दीपत्रक :-**

संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा गरीब रुग्णांना उपलब्ध करुन देणे व त्यावर देखरेख ठेवण्यासाठी "राज्यस्तरीय विशेष मदत कक्ष" स्थापन करण्यात आला आहे. तसेच सदर राज्यस्तरीय विशेष मदत कक्षास सहाय्य करण्यासाठी जिल्हास्तरीय समिती पुनर्गठीत करण्यात आली आहे. सदर जिल्हास्तरीय समितीसंदर्भात अन्य तरतूदी कायम ठेवून समितीच्या संरचनेमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेः-

**जिल्हास्तरीय समिती**

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | जिल्ह्यातील दोन विधानसभा / विधानपरिषद सदस्य | सदस्य |
| ३. | संबंधित जिल्ह्यात शासकीय वैद्यकीय महाविद्यालय असल्यास संबंधित जिल्ह्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाचे अधिष्ठाताफ़ | सदस्य |
| ४. | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५. | जिल्ह्यातील वैद्यकीय क्षेत्रातील एक समाजसेवक | सदस्य |
| ६. | जिल्ह्यातील वैद्यकीय क्षेत्रातील दोन तज्ञ | सदस्य |
| ७. | सहायक धर्मादाय आयुक्त | सदस्य सचिव |

२. सदर समितीने तीन महिन्यात किमान एकदा बैठक घ्यावी व त्याचा अहवाल धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांना सादर करावा व त्याची प्रत शासनास सादर करावी.

३. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५०९१७१०३२६६१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHENDRA RAMCHANDRA JADHAV

Digitally signed by MAHENDRA RAMCHANDRA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=3971ec243f15cd8a25bfd6dbaf74efe04f80d57c22e473eb8eaac7ac344ac25a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=846337C71F3B3405F8D8448578B4ED3DDBE6ED2DB306E26977B3CDCCDDC27F14, cn=MAHENDRA RAMCHANDRA JADHAV
Date: 2024.05.09 17:25:38 +05'30'

**( महेंद्र जाधव )**

**उप विधि सल्लागार - नि-उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.उप मुख्यमंत्री (विधि व न्याय) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
९) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
१०) मा.सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
११) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४) सर्व धर्मादाय सह आयुक्त / उप आयुक्त, (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).
१५) सर्व सहायक धर्मादाय आयुक्त (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत) .
१६) सर्व जिल्हाधिकारी.
१७) सर्व धर्मादाय रुग्णालये (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).